**केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत वैरणीच्या विटा तयार करणेसाठी युनिट स्थापन करणे या योजनेस प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक.एफडीआर-२०१०/प्र.क्र.४७८/पदुम-४**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-३२**
**दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०१०.**

**वाचा -** केंद्र शासनाचे पत्र क्र.२-४१/२००७ - एएचटी / एफएफ भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली, दिनांक २७/०४/२०१०.

**प्रस्तावना -** टंचाई, अतिवृष्टी इ. नैसर्गिक आपत्तीच्या वेळी पशुधन जगविण्यासाठी आवश्यक वैरणीची उपलब्धता व्हावी यासाठी पिकांच्या अवशेषाचा योग्य विनियोग करून अत्याधुनिक तंत्रज्ञानाद्वारे पोषणयुक्त आहार निर्मितीसाठी, केंद्र शासनाने ११ व्या पंचवार्षिक योजने अंतर्गत वैरणीच्या विटा तयार करणेसाठी युनिट स्थापन करणे या योजनेस मंजूरी दिलेली आहे. या योजनेत एका युनिट करिता रू ८५.०० लाखाचा खर्च अपेक्षित असून प्रत्येक युनिटसाठी ५० टक्के म्हणजे रू ४२.५० लाख एवढे अनुदान केंद्र शासनाकडून मिळणार आहे व उर्वरित ५० टक्के रक्कम संबंधित संस्थेने बँकेकडून कर्ज घेवून उभी करावयाची आहे.

सदर योजना राज्यात राबवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत ''**वैरणीच्या विटा तयार करणेसाठी युनिट स्थापन करणे**'' ही योजना सन २०१०-११ पासून राज्यात राबविण्यास याद्वारे शासनाची प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

१. वैरणीच्या विटा तयार करणेसाठी युनिट स्थापन करणे करिता एका युनिटची खर्चाची कमाल मर्यादा रू ८५.०० लाख असेल. या पेक्षा जास्त निधी आवश्यक असल्यास तो संबंधित संस्थेने उभा करावा.
२. एका युनिटच्या प्रकल्प स्थापनेसाठी केंद्र शासनाचे ५० टक्के अनुदान अनुज्ञेय राहील तथापि, अनुदानाची कमाल मर्यादा प्रति युनिट रू ४२.५० लाख इतकीच असेल व उर्वरित ५० टक्के रक्कम युनिट स्थापन करणाऱ्या संस्थेस बँकेकडून कर्ज घेवून उभारावी लागेल. या योजने अंतर्गत रू ८५.०० लाख या पेक्षा कमी निधीचे प्रस्ताव देखील विचारात घेता येतील.
३. सदर प्रकल्प आर्थिक दृष्ट्या सक्षम असल्याबाबत राष्ट्रीयकृत बँक/नाबार्ड यांनी प्रमाणित करणे आवश्यक असून फक्त अशा संस्थांचाच अर्थसहाय्यासाठी विचार करण्यात यावा.
४. सहकारी दुग्ध संस्था इतर सहकारी संस्थांच्या प्रस्तावाचा प्रथम प्राधान्याने विचार करण्यात यावा. सहकारी संस्थांचे प्रस्ताव उपलब्ध नसल्यास, खाजगी संस्थांचे प्रस्ताव विचारात घ्यावेत.
५. सदर योजनेस तालुका/जिल्हास्तरावर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी व केंद्र शासनाने विहित केलेल्या नमुन्यातच प्रकल्प प्रस्ताव सादर करण्यासाठी विशिष्ट कालावधी ठरवून देण्यात यावा. संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्या स्तरावर प्रकल्प प्रस्ताव मागवण्यात यावा व त्यांनी प्रस्तावित प्रकल्प स्थळास प्रत्यक्ष भेट देवून त्यांचे स्वयंस्पष्ट अभिप्राय देवून जिल्ह्यातील एकत्रित प्रस्ताव संबंधित प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन यांच्या मार्फत आयुक्त पशुसंवर्धन यांना सादर करण्यात यावेत.
६. आयुक्त पशुसंवर्धन यांनी खालील तांत्रिक समितीद्वारे प्राप्त झालेल्या सर्व प्रकल्प प्रस्तावांची छाननी करून सर्व बाबींची पुर्तता करत असलेले परिपूर्ण प्रस्ताव शासनास त्यांच्या शिफारशीसह दोन प्रतीत विहित कालमर्यादेत एकदाच सादर करण्यात यावेत.

**तांत्रिक समिती**

१. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, आयुक्त पशुसंवर्धन यांचे कार्यालय - अध्यक्ष
१. उपआयुक्त पशुसंवर्धन (पशुधन/कुक्कुट विकास) आयुक्त कार्यालय सदस्य
२. उपआयुक्त पशुसंवर्धन (नियोजन) आयुक्त कार्यालय सदस्य
३. उपआयुक्त पशुसंवर्धन (वैरण विकास) आयुक्त कार्यालय सदस्य सचिव

७. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनाप्रमाणे ठरवून दिलेल्या वित्तीय मर्यादेनुसार अनुसूचित जाती/जमाती व महिलांच्या सहकारी संस्थांचे प्रकल्प प्रस्ताव विचारात घेण्यात यावेत.

८. राज्यातील ज्या भागात वैरणीची उपलब्धता कमी आहे अशा भागातील प्रस्तावांचा प्राधान्याने विचार करण्यात यावा.

९. सदर योजनेसाठी केंद्र हिश्या पोटी ५० टक्के अनुदानासाठी लागणारा आवश्यक निधी दरवर्षी खालील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात यावा.

**केंद्र हिस्सा लेखाशिर्ष**
२४०३-पशुसंवर्धन
१०२-पशु व म्हशीचा विकास
(०७)(०४) प्रकर्षित पशु विकास प्रकल्प
केंद्र पुरस्कृत योजना
२१-पुरवठा व साधन सामग्री
(संकेतांक - २४०३ १८६२)

१०. या योजनेच्या खर्चाचा व भौतिक साध्याचा तिमाही अहवाल विहित केलेल्या प्रपत्रात राज्य शासनास सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे, विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रही सादर करण्यात यावे.

११. या योजने अंतर्गत राज्यातील वने, कृषि विभाग यांनी त्यांचे विभागाचे प्रस्ताव त्यांच्या विभागाच्या प्रधान सचिव/सचिवांच्या मान्यतेने सचिव पशुसंवर्धन यांचेकडे सादर करावेत. तसेच इतर संस्था जसे की राज्य शासन अंगीकृत/स्वयंसेवी/सेवाभावी संस्था त्यांचे प्रस्ताव आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे सादर करतील व असे प्रस्ताव आयुक्त पशुसंवर्धन यांचेकडून राज्याच्या पशुसंवर्धन विभागाकडे सादर होतील.

१२. पशुसंवर्धन विभागामार्फत ही योजना ५० टक्के केंद्र हिस्सा व उर्वरित ५० टक्के हिस्सा संबंधित संस्थेचे बँक कर्ज या प्रमाणे राबविण्यात येणार आहे. वन व कृषि विभागास सदरची योजना राबवावयाची असल्यास या योजने अंतर्गत युनिट स्थापन करणेसाठी ५० टक्के राज्य हिश्याचा निधी त्या-त्या संबंधीत विभागाकडून अर्थसंकल्पित करणे आवश्यक राहील.

१३. आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयातील उपसंचालक (वैरण विकास) हे सदर योजनेचे सनियंत्रण करतील.

१४. प्रकल्पातून निर्माण झालेल्या मालमत्तेवर केंद्र व राज्य शासनाचा अधिकार असेल व या मालमत्तेची विल्हेवाट राज्य शासनाच्या मान्यतेशिवाय लावता येणार नाही.

१५. टंचाई परिस्थितीत व आवश्यकतेनुसार राज्यात ज्या भागात चा-याची आवश्यकता असेल त्यावेळी आयुक्त पशुसंवर्धन, पुणे हे निश्चित करतील त्या दराने वैरणीच्या विटांचा पुरवठा करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

१६. महालेखापाल यांच्या लेखा परिक्षणासाठी योजने अंतर्गत होणा-या खर्चाचे अभिलेख व इतर अनुषंगिक बाबी अद्ययावत ठेवणे संस्थेस बंधनकारक राहील. याबाबत आयुक्त पशुसंवर्धन यांचे स्तरावरून सदर संस्थेची, त्यातून उत्पादित होणा-या वैरणीच्या विटा आणि त्याची गुणवत्ता याची वेळोवेळी पाहणी करावी.

१७. दर महिन्यात उत्पादित होणा-या तसेच जिल्हानिहाय विक्री करण्यात आलेल्या विटांचा व त्यांच्या दरांचा तपशील संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्यामार्फत आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांना सादर करणे बंधनकारक राहील.

१८. प्रकल्प स्थापनेनंतर संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांनी सदर प्रकल्पाची नियमितपणे पाहणी करून पाहणी अहवाल आयुक्त पशुसंवर्धन यांना सादर करणे आवश्यक राहील.

१९. प्रकल्पाच्या उभारणीसाठी वितरीत होणाऱ्या अनुदानाचा विनियोग दिलेल्या प्रयोजनासाठीच करण्यात यावा अन्यथा व्याजासह दिलेल्या अनुदानाची एक रकमी वसुली महसुली कार्यपध्दतीने संस्थेकडून करण्यात यावी.

प्रस्तुतचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०२/ का-१४३१ दि.१३/१०/२०१० तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ६३४/१०/ व्यय-२, दि.२०/१०/२०१०अन्वये त्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१०२९१४४१४०००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

सही/-
**(प्रणाली चिटणीस)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
अप्पर मुख्य सचिव, कृषि व फलोत्पादन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अप्पर मुख्य सचिव, वने व महसुल विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०१(५ प्रतीत)
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०१
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
महाराष्ट्र राज्य सहकारी दुध उत्पादक संघ (महानंद), गोरेगांव, मुंबई
प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व)
जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा सहकारी दुध संघ (सर्व)
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
अवर सचिव (पदुम-१६/पदुम-३) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
कक्ष अधिकारी पदुम-१/१अ/८, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती